**सहकारी सूतगिरण्यांच्या यंत्रसामुग्री खरेदीबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः सूतगि १०११/प्र.क्र.२००/पुनर्बांधणी-३/टेक्स १ (ब)**
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय विस्तार, मुंबई-४०० ०३२.
तारीख: १९ नोव्हेंबर, २०१८.

वाचा :-

**१) सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, शासन निर्णय क्रमांकः सूतगि १०११/प्र.क्र.२००/टेक्स १ (ब), दिनांक : २ डिसेंबर, २०११.**

प्रस्तावना :-

वाचा येथील शासन निर्णयानुसार सहकारी सूतगिरण्यांच्या यंत्रसामुग्री खरेदीसाठी कार्यपध्दती निश्चित करण्यात आली आहे. सदरहू कार्यपध्दती सन २०११ मध्ये निश्चित करण्यात आलेली आहे. त्यामुळे सहकारी सूतगिरण्यांसाठी यंत्रसामुग्री खरेदी करण्याच्या अनुषंगाने यंत्रसामुग्रीचे दर निश्चित करुन यंत्रसामुग्री उत्पादकांची नामतालिका तयार करण्यासाठी समिती स्थापन करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती, त्यास अनुसरुन पुढील प्रमाणे निर्णय घेण्यात येत आहे.

**शासन निर्णय :-**

राज्यातील सहकारी सूतगिरण्यांसाठी यंत्रसामुग्री खरेदी करण्याच्या अनुषंगाने दर निश्चित करण्यासाठी व यंत्रसामुग्री उत्पादकांची नामतालिका तयार करण्याच्या अनुषंगाने संचालक वस्त्रोद्योग नागपूर यांचे अध्यक्षतेखाली समिती स्थापन करण्यात येत आहे. सदर समितीची रचना व कार्यपध्दती खालील प्रमाणे असेल :-

| अनु क्र. | नांव / पदनाम | अध्यक्ष /सदस्य |
|---|---|---|
| १ | संचालक वस्त्रोद्योग नागपूर | अध्यक्ष |
| २ | श्री. गंगोपाध्याय, ससमिरा, मुंबई | सदस्य |
| ३ | कार्यकारी संचालक, महाराष्ट्र राज्य वस्त्रोद्योग महासंघ मुंबई | सदस्य |
| ४ | सूतगिरणी यंत्रसामुग्री क्षेत्रातील किमान २-३ तज्ञ व्यक्ती (संचालक वस्त्रोद्योग यांचेमार्फत नियुक्त) | सदस्य |
| ५ | सह संचालक (सूतगिरणी), वस्त्रोद्योग संचालनालय नागपूर | सदस्य सचिव |

**कार्यपध्दती :-**

१) समितीने सहकारी सूतगिरण्यांना यंत्रसामुग्री खरेदी करण्यासाठी उत्पादकांची नामतालिका व स्वारस्याचा नमुना प्रारुप तयार करुन त्याबाबत वर्तमानपत्रामध्ये जाहिरात देऊन संपूर्ण प्रक्रीया पूर्ण करावी.

२) समितीने यंत्रसामुग्रीचे दर निश्चित करुन यंत्रसामुग्री उत्पादकांची नामतालिका तयार करण्याबाबतची कार्यवाही ३ महिन्यात पूर्ण करावी.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१८१११९१५३८२९६९०२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Vishal Vishvas Madane

Digitally signed by Vishal Vishvas Madane
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Co-op Marketing and Textile, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=bb0ed28a897fc87f69fe8807b3d9428966ce3233edb83a20c38834c19f2e3793, cn=Vishal Vishvas Madane
Date: 2018.11.19 15:42:50 +05'30'

**( विशाल मदने )**

अवर सचिव, महाराष्ट्र शासन.

**प्रत,**

१) मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई ३२,
२) मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई,
३) मा. मंत्री (वस्त्रोद्योग) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई,
४) मा. राज्यमंत्री (वस्त्रोद्योग) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई,
५) महालेखापाल, (लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र-१ मुंबई / महाराष्ट्र-२, नागपूर,
६) महालेखापाल, (लेखापरिक्षा) महाराष्ट्र-१ मुंबई / महाराष्ट्र-२, नागपूर,
७) प्रधान सचिव (वस्त्रोद्योग) यांचे स्वीय सहाय्यक,
८) प्रधान सचिव (सहकार) यांचे स्वीय सहाय्यक,
९) कार्यासन अधिकारी (रोखशाखा), सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग (४ प्रतींसह),
१०) कार्यासन अधिकारी, १६-सी, १७-सी, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग,
११) वित्त विभाग, व्यय-२ / अर्थसंकल्प-१३, मंत्रालय, मुंबई-३२,
१२) नियोजन विभाग, कार्यासन-१४३१, मंत्रालय, मुंबई-३२,
१३) सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य, पुणे,
१४) संचालक, वस्त्रोद्योग संचालनालय,महाराष्ट्र राज्य, नागपूर,
१५) प्रादेशिक उपसंचालक, वस्त्रोद्योग, सोलापूर / औरंगाबाद / नागपूर /मुंबई ,
१६) सर्व जिल्हा उपनिबंधक, सहकारी संस्था,
१७) निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई,
१८) अधिदान व लेखाधिकारी, मुंबई,
१९) ग्रंथपाल, महाराष्ट्र विधान मंडळ सचिवालय, विधान भवन, मुंबई (२ प्रती),
२०) कार्यकारी संचालक, महाराष्ट्र राज्य सहकारी वस्त्रोद्योग महासंघ मर्यादित, वकील हाऊस, मुंबई-१,
२१) श्री. गंगोपाध्याय, ससमिरा, मुंबई,
२२) निवडनस्ती (टेक्स १ अ / ब).